आदिवासी क्षेत्र उपयोजना आदिवासी क्षेत्राबाहेरील उपयोजना मार्च, २०१० च्या अधिवेशनात अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या "मागासवर्गीयाचे कल्याण" उपशिर्षाखालील योजनांतर्गत प्रकल्प कार्यालये बांधकामासाठीच्या राज्यस्तरीय तरतूदींचे वाटप.

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्र.बीयुडी-२०१०/प्र.क्र.१८६/का.६**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक :- १० फेब्रुवारी, २०११**

**वाचा :-** १) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.बीयुडी-२०१०/प्र.क्र.१८६/का-६/दि. २६ -८-२०१०
२) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र. प्रकाबां २००९/प्र.क्र.११/का.८(६), दि.८-९-२०१०.
३) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र-बीयुडी २००९/प्र.क्र.१९४/का.६ दि.२४ जानेवारी, २०११
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र-अंदाज २०१०/सीआर ६५/२०१०/अर्थसंकल्प-३ दि. ३ एप्रिल, २०१०
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र-अंदाज २०१०/ प्र.क्र. ७१/२०१०/अर्थसंकल्प-३ दि. १८ मे, २०१०
६) का.अ, सा.बां.वि, संगमनेर यांचे क्र.लेखा/अर्थ/३३३/२०११, दि.१३.१.२०११ चे पत्र.

**शासन निर्णय :-** उपरोक्त क्रमांक १ शासन निर्णयामध्ये सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय यांच्या अधिनस्त क्षेत्रिय कार्यालयाचे (शासकीय आश्रमशाळा गोडावून बांधकाम, प्रकल्प कार्यालय बांधकाम व भरतीपूर्व प्रशिक्षण केंद्र इमारत बांधकाम) बांधकामासाठी तरतूद ठेवण्यात आली होती. वर नमूद केलेला क्र. ३ अन्वये आदिवासी उपयोजनेतंर्गत इतर विभागांना राज्यस्तरीय योजनांसाठी उपलब्ध केली जाणारी तरतूद पूर्वीप्रमाणेच आदिवासी विकास विभागामार्फतच संबंधीत योजनांच्या अंमलबजावणी अधिका-यांच्या अधिनस्त ठेवण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार तरतूद या शासन निर्णयान्वये संबंधित कार्यान्वयीन यंत्रणेच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांच्या उक्त क्रमांक २ व क्र.६ येथील पत्रान्वये प्राप्त तपशिलानुसार तरतूदी वितरित करण्यात येत असून त्या पूर्णपणे खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे. या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्रातील स्तंभ २ मध्ये दर्शविलेल्या जिल्हानिहाय तरतूदी खर्च करण्यास मंजूरी देण्यात येत असून स्तंभ ३ मध्ये दर्शविलेल्या नियंत्रण अधिका-यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे. या तरतूदी वित्त विभागाच्या मासिक खर्च विवरणपत्रात (कॅश फ्लो) मध्ये दर्शविल्याप्रमाणे खर्च करण्यात याव्यात. संगणक वितरण प्रणालीमध्ये या तरतूदीचे वितरण संबंधित अधिक्षक अभियंता यांना थेट करण्यात आले आहे. त्यांनी त्याचे वाटप संबंधित आहरण व संवितरण अधिकारी निहाय करावे.

२. अंमलबजावणी अधिकारी आणि विभागप्रमुख यांनी ही तरतुद शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.टिएसपी-१०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५ दिनांक ९.३.१९९० अन्वये निश्चित केलेल्या आदिवासी उपयोजना क्षेत्रातील व क्षेत्राबाहेरील मान्य कार्यक्रमांवर/योजनांवर खर्च होतील याची दक्षता घ्यावी. तसेच या तरतूदी खर्च करतांना शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.टिएसपी-२००३/प्र.क्र.१०१/का-६, दिनांक २६ जुलै, २००४ व क्र.टिएसपी-२००५/प्र.क्र.५९/का-६, दिनांक १० नोव्हेंबर, २००५ मधील अटींचे कटाक्षाने पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३. अंमलबजावणी अधिकारी व विभाग प्रमुख यांनी मुख्य आदिवासी उपयोजना क्षेत्रात अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला मुख्य आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवता येईल व तो केंद्रशासनाला कळविता येईल.

४. सर्व अंमलबजावणी अधिका-यांनी योजनावार मासिक खर्चाची विवरणे मुख्य आदिवासी क्षेत्र व अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रासाठी व आदिवासी क्षेत्राबाहेरील क्षेत्रासाठी स्वतंत्रपणे विहीत प्रपत्रात ज्या महिन्यात खर्च झाला असेल त्याच्या पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यंत या विभागास, नियोजन विभाग, वित्त विभाग व इतर संबंधित प्रशासकीय विभाग व आदिवासी विकास, आयुक्त यांचे कार्यालय, नाशिक यांना पाठवाव्यात.

५. अंमलबजावणी अधिकारी/विभाग प्रमुख यांनी नियम प्रचलित कार्यपध्दती व सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन चालू योजनांवर खर्च करावा. हे आदेश फक्त अंमलबजावणी/नियंत्रक अधिका-यांच्या अधिनस्त ठेवलेल्या तरतुदीस प्रशासकीय दृष्टया मान्यता केलेल्या चालू योजनांवर खर्च करण्यासाठी आहे. याची अंमलबजावणी अधिका-यांनी नोंद घ्यावी.

६. सन २०१०-११ मध्ये अर्थसंकल्पीय अंदाज भाग-३ मध्ये आश्रमशाळा/वसतिगृहे बांधकामे यांचा चालू कामांपैकी सर्वच कामांचा काम निहाय तपशिल समाविष्ट होऊ शकलेला नाही. त्यामुळे अर्थसंकल्पीय अंदाज भाग-३ मध्ये समावेश न झालेल्या ज्या चालू कामांना प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे निधी उपलब्ध होत आहे ती कामे अर्थसंकल्पात समाविष्ट करण्यासाठी कार्यवाही करण्यात येत आहे.

**७. आदिवासी उपयोजनेअंतर्गत जनजाती क्षेत्र उपयोजना (टिएसपी) व जनजाती क्षेत्र उपयोजना (ओटिएसपी) यांचा खर्च स्वतंत्रपणे नोंदविण्यासाठी सन २०१०-११ च्या अर्थसंकल्पातून लेखाशिर्षामध्ये काही बदल करण्यात आले आहेत हे बदल लक्षात घेवून खर्च नोंदविताना सुधारित लेखाशिर्ष नोंदविण्याची दक्षता सर्व संबंधितांनी घ्यावी.**

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा **संगणक सांकेतांक २०११०२१०१९३१५२००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( सु. द. नाईक )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रति,**

आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/ नागपूर/ ठाणे/ अमरावती.
महालेखापाल (लेखापरिक्षा)/ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर. (प्रत्येकी ५ प्रती)
विभागीय आयुक्त, मुंबई/ नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती/ पुणे.
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प (सर्व)
आयुक्त , आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
अधिक्षक अभियंता, विशेष प्रकल्प मंडळ, कोकण भवन, नवी मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी, जि.नंदुरबार/ ठाणे/ गडचिरोली/ नांदेड/ यवतमाळ/ नाशिक/ पुणे/ अमरावती
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई. (इमारती)
संचालक, लेखा व कोषागारे ,नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई -३२.
सर्व कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती (का-६) आदिवासी विकास विभाग

## जनजाती उपयोजनेखालील सन २०१०-११ चे जिल्हानिहाय अर्थसंकल्पीय तरतुदीचे वाटप

(रुपये हजारात)

| **शिर्ष : सार्वजनिक बांधकाम**<br>**योजनेचे नांव :** क्षेत्रिय (प्रकल्प) कार्यालयांचे बांधकाम. | | **मागणी क्रमांक टी-६**<br>मुख्य लेखाशिर्ष : ४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-०१- कार्यालयीन इमारती-७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (००) (०१) बांधकाम सर्वसाधारण एकत्रित निवास व्यवस्था<br>(४०५९ ०२३३) ५३, मोठी बांधकामे | | |
|---|---|---|---|---|
| **कामाचे नांव** | **२०१०-११ साठी केलेली अर्थसंकल्पीय तरतूद** | **२०१०-११ ची अर्थसंकल्पीय तरतूद सुपूर्द करण्यात आलेला नियंत्रक अधिकारी** | **प्रशासकीय विभाग** | **शेरा** |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| शासकीय आश्रमशाळा, गोडावून, भिनार,जि. ठाणे. | १५६३ | संबंधित अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ. | आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई. | निव्वळ बांधकामाची तरतूद टक्केवारी खर्च वगळून. |
| शासकीय आश्रमशाळा, गोडावून, न्याहाळे, जि. ठाणे. | १५६३ | | | |
| शासकीय आश्रमशाळा, गोडावून, तवा, जि. ठाणे. | १५६३ | | | |
| शासकीय आश्रमशाळा, गोडावून, पंढरघोळ, जि. ठाणे. | ९८५ | | | |
| शासकीय आश्रमशाळा, गोडावून, कोटमदरा, जि. पुणे | १५६३ | | | |
| शासकीय आश्रमशाळा, गोडावून ब्राम्हणी जि. औरंगाबाद | १००० | | | |
| शासकीय आश्रमशाळा, गोडावून,साखरणी, जि.नांदेड. | १००० | | | |
| शासकीय आश्रमशाळा, गोडावून अंबोली जि. नाशिक. | १००० | | | |
| शासकीय आश्रमशाळा, गोडावून, नंदूरबार जि. नंदूरबार | १६३ | | | |
| शासकीय आश्रमशाळा, गोडावून, लोभाणी, जि. नंदूरबार. | २७१ | | | |
| प्रकल्प कार्यालय, भामरागड, जि. गडचिरोली. | ५९३८ | | | |
| प्रकल्प कार्यालय, नंदूरबार जि. नंदूरबार | १४३५ | | | |
| प्रकल्प कार्यालय, तळोदा, जि. नंदूरबार | १२६२ | | | |
| प्रकल्प कार्यालय, पांढरकवढा जि. यवतमाळ. | १००३ | | | |
| प्रकल्प कार्यालय, किनवट, जि. नांदेड | १००० | | | |
| अपर आयुक्त, आदिवासी विकास, अमरावती इमारत बांधकाम | ५००० | | | |
| नाशिक-सैनिक व पोलीसदल भरतीपूर्व प्रशिक्षण केंद्र | ७६७३ | | | |
| ठाणे-पळसुदे, ता. जव्हार सैनिक व पोलीसदल भरतीपूर्व प्रशिक्षण केंद्र | ५४९६ | | | |
| सैनिक व पोलिसांना भरतीपूर्व प्रशिक्षण देण्यासाठी मवेशी ता.अकोले | ४००० | | | |
| **एकूण-** | **४३४७८** | | | |